**अंगणवाडी केंद्र इमारतीमध्ये शौचालयाचे बांधकाम करणे व पिण्याच्या पाण्याची सुविधा उपलब्ध करुन देण्यासाठी अर्थसंकल्पित केलेला निधी खर्च करण्यास मंजूरी देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बाल विकास विभाग**
**शासन निर्णय क्र. एबावि-२०१८/प्र.क्र. ४०८/का.६**

नवीन प्रशासन भवन, ३ रा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक :-१८ जानेवारी, २०१९

**संदर्भ** :- (१) महिला व बाल विकास विभाग,शा.नि. क्र.एबावि-२००७/प्र.क्र.३४८/का.६ दिनांक ३० जून , २०१८

(२) महिला व बाल विकास विभाग केंद्र शासनाचे पत्र क्र.F.No.CD-१४/७/२०१७-CD.II,दिनांक ३० डिसेंबर २०१७

(३) महिला व बाल विकास विभाग,शा.नि. क्र.एबावि-२०१८/प्र.क्र.४०८/का.६ दिनांक ५ डिसेंबर , २०१८

**शासन निर्णय:-**

एकात्मिक बाल विकास सेवा योजना ही केंद्र पुरस्कृत योजना असून या योजनेची सुरुवात सन १९७५ पासून महाराष्ट्र राज्यात झाली. क्रमाक्रमाने योजनेच्या प्रकल्प संख्येत वाढ होऊन राज्यातील विविध नागरी, ग्रामीण व आदिवासी क्षेत्रात प्रकल्प कार्यन्वीत करण्यात आलेले आहेत. या योजनेअंतर्गत अंगणवाडीच्या माध्यमातून बालके, गरोदर स्त्रिया व स्तनदा माता यांना ६ महत्त्वाच्या सेवा उदा. लसीकरण, पूर्व प्राथमिक शिक्षण, पुरक पोषण आहार, संदर्भ सेवा, आरोग्य तपासणी, १५ ते ४५ वयोगटातील स्त्रियांना आरोग्य व पोषण विषयक शिक्षण, इत्यादीचा सेवा पुरविण्यात येतात.

२. महिला व बाल विकास विभाग,शा.नि. क्र.एबावि-२००७/प्र.क्र.३४८/का.६ दिनांक ३० जून , २०१८ च्या शासन निर्णयान्वये स्वत:च्या मालकीच्या अंगणवाडी केंद्र इमारतीमध्ये शौचालयाचे बांधकाम करणे व पिण्याच्या पाण्याची सुविधा उपलब्ध करुन देण्याबाबत मंजूरी देण्यात आलेली आहे. त्यानुसार स्वत:ची मालकी असलेल्या ज्या अंगणवाडी केंद्रांना शौचालय सुविधा नाही अशा अंगणवाडी केंद्राना शौचालय बांधकाम व पिण्याच्या पाण्याची सुविधा उपलब्ध करुन देण्यासाठी खालीलप्रमाणे निधी केंद्र ६०% व राज्य ४०% याप्रमाणात निधी उपलब्ध करुन देण्यात येणार आहे.

| अ.क्र. | बाब | रक्कम | केद्र लेखाशिर्ष ६०% | राज्य लेखाशिर्ष ४०% |
|---|---|---|---|---|
| १ | स्वत:च्या मालकीच्या विद्यमान अंगणवाडी केंद्र इमारतीमध्ये शौचालयाचे बांधकाम करणे. (अंगणवाडी केंद्रे ७३६५) | (प्रति अंगणवाडी केंद्र रुपये १२,०००/-) (रुपये बारा हजार फक्त) | २२३६२०४८ | २२३६२०५७ |
| २ | पिण्याच्या पाण्याची सुविधा उपलब्ध करुन देणे. ( अंगणवाडी केंद्रे २९६९) | (प्रति अंगणवाडी केंद्र रुपये १०,०००/-) ( रुपये दहा हजार फक्त) | २२३६२०२१ | २२३६२०३९ |

३. केंद्र शासनाच्या महिला व बाल विकास विभागाने संदर्भाधिन दिनांक ३० डिसेंबर २०१७ च्या पत्रान्वये अंगणवाडी केंद्र इमारतीमध्ये शौचालय बांधकाम करणे व पिण्याच्या पाण्याची सुविधा उपलब्ध करुन देण्यासाठी केंद्र हिश्याचा निधी उपलब्ध करुन दिलेला आहे. राज्यातील स्वत:च्या मालकीच्या अंगणवाडी मध्ये शौचालय बांधकाम करणे व पिण्याच्या पाण्याची सुविधा उपलब्ध करुन देण्यास दिनांक ५ डिसेंबर २०१८ च्या शासन निर्णयान्वये मंजूरी देण्यात आलेली आहे.

४. माहे डिसेंबर-२०१८ च्या हिवाळी अधिवेशनात अर्थसंकल्पित केलेला खालीलप्रमाणे योजनेचा निधी **रुपये ११८०.७० लाख** खर्च करण्यास आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवायोजना,नवी मुंबई यांना शासन मंजूरी देत आहे.

सदर निधी सन २०१७-१८ मध्ये केंद्र शासनाने उपलब्ध करुन दिलेला असल्यामुळे तो सन २०१८-१९ मध्ये खर्च करण्यास केंद्र शासनाकडून निधी Revalide करुन घेण्याची कार्यवाही आयुक्त,एकात्मिक बाल विकास सेवा योजना,नवी मुंबई यांनी करुन नंतरच निधी खर्च करण्याची कार्यवाही करावी.

( रुपये लाखात)

| अ.क्र. | लेखाशिर्ष | मंजूर तरतुद | या शासन निर्णयान्वये वितरीत तरतुद |
|---|---|---|---|
| **अंगणवाडीमध्ये पिण्याच्या पाण्याची सुविधा पुरविणे** | | | |
| १ | २२३६२०२१ (केंद्र ६०% ) | २७,लहान बांधकामे- रु ०.०१<br>५०- इतर खर्च- रु.१७८.१३<br>--------------<br>रुपये १७८.१४ | रु.१७८.१४ |
| २ | २२३६२०३९ (राज्य ४०% ) | २७,लहान बांधकामे - रु. ०.०१<br>५०- इतर खर्च- रु. ११८.७५<br>--------------<br>रुपये ११८.७६ | रु.११८.७६ |
| | | एकुण | **रु.२९६.९०** |
| अ.क्र. | लेखाशिर्ष | मंजूर तरतुद | या शासन निर्णयान्वये वितरीत तरतुद |
| **अंगणवाडीमध्ये शौचालय बांधकाम करणे** | | | |
| १ | २२३६२०४८ (केंद्र ६०% ) | २७,लहान बांधकामे- रु ०.०१<br>५०- इतर खर्च- रु.५३०.२७<br>--------------<br>रुपये ५३०.२८ | रु.५३०.२८ |
| २ | २२३६२०५७ (राज्य ४०% ) | २७,लहान बांधकामे - रु. ०.०१<br>५०- इतर खर्च- रु. ३५३.५१<br>--------------<br>रुपये ३५३.५२ | रु.३५३.५२ |
| | | एकुण | **रु.८८३.८०** |

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९०११९१५५५२५५५३० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Lalsing
Ramchandra Gujar

Digitally signed by Lalsing Ramchandra Gujar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Women And Child Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c3eb5f6c3e4855c5793924cf2a352b44266d360de02a2494e1a64477bf79d694, serialNumber=4ca059ab7b8d64aaf749fe58e0a714a015f521cb28fd2204e49a4d81f12a5745, cn=Lalsing Ramchandra Gujar
Date: 2019.01.21 17:38:07 +05'30'

( ला.रा. गुजर )
सह सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत :-**

१. मा. राज्यपालांचे सचिव,राजभवन,मुंबई
२. मा. मुख्यमंत्र्यांचे अपर मुख्य सचिव,मंत्रालय,मुंबई
३. मा.विरोधी पक्ष नेता,विधानसभा/विधानपरिषद,विधानभवन,मुंबई
४. मा.मंत्री/राज्यमंत्री (महिला व बाल विकास) ,मंत्रालय,मुंबई
५. सर्व मा. मंत्री व राज्यमंत्री , मंत्रालय, मुंबई
६. मा. मुख्य सचिव ,महाराष्ट्र शासन,मंत्रालय,मुंबई
७. प्रधान सचिव,महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,मुंबई
८. शासनाचे सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, मंत्रालय, मुंबई
९. अपर मुख्य सचिव ( नियोजन) ,नियोजन विभाग,मंत्रालय,मुंबई
१०. प्रधान सचिव (वित्तीय सुधारणा),वित्त विभाग,मंत्रालय,मुंबई
११. प्रधान सचिव ( मा.तं) ,माहिती तंत्रज्ञान विभाग,मंत्रालय,मुंबई
१२. सचिव, महिला व बाल विकास विभाग,मंत्रालय,मुंबई
१३. सचिव,ग्राम विकास विभाग,मंत्रालय,मुंबई
१४. महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई
१५. सर्व विभागीय आयुक्त
१६. आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, महाराष्ट्र राज्य,नवी मुंबई
१७. आयुक्त,महिला व बाल विकास ,पुणे
१८. सर्व जिल्हाधिकारी
१९. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद
२०. सर्व विभागीय उप आयुक्त,महिला व बाल विकास विभाग
२१. सर्व महिला व बाल विकास अधिकारी ( जिल्हा परिषद)
२२. सर्व बाल विकास प्रकल्प अधिकारी ( ग्रमीण/नागरी/आदिवासी प्रकल्प)
२३. महालेखापाल, महाराष्ट्र राज्य (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर
२४. महालेखापाल, महाराष्ट्र राज्य (लेखा व परिक्षा), मुंबई / नागपूर
२५. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
२६. सर्व उपसचिव / अवर सचिव / कक्ष अधिकारी, महिला व बाल विकास विभाग,मंत्रालय,मुंबई
२७. कक्ष अधिकारी (का.४) महिला व बाल विकास विभाग मंत्रालय त्यांना कळविण्यात येते की,त्यांनी BDS वर निधी वितरीत करावा.
२८. निवड नस्ती (का-६).